पूररेषेच्या आत अपरिहार्य बांधकामास ना-हरकत प्रमाणपत्र देण्याचे अधिकार क्षेत्रिय मुख्य अभियंता यांना प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः एफडीडब्ल्यू-२०१३/(प्र.क्र.२८१/२०१३)/सिं.व्य.(महसूल),**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ८ ऑगस्ट, २०१४

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक पाटबंधारे विभाग क्र.एफडीडब्ल्यू-१०८९/प्र.क्र.२४३/८९/सिं.व्य.(कामे), दिनांक २१.०९.१९८९

२) शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्रमांकः एफडीडब्ल्यू-२०१३/(प्र.क्र.२८१/२०१३) /सिं.व्य. (महसूल), दिनांक ११ जुलै, २०१४

**प्रस्तावना:-**

उपरोक्त शासन परिपत्रक जलसंपदा विभाग क्रमांकः एफडीडब्ल्यू -२०१३/ (प्र.क्र.२८१ /२०१३)/सिं.व्य.(महसूल) दिनांक ११ जुलै, २०१४ हे संकेतस्थळावर अपलोड करतांना त्यात काही दोष राहून गेले होते. त्यामुळे सदर शासन परिपत्रक रद्दबातल करून दोषरहीत परिपत्रक निर्गमित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.तरी दि.११ जुलै, २०१४ चे परिपत्रक अधिक्रमीत करून खालीलप्रमाणे सुधारित सूचना देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक:-**

शहरांच्या/ गावांच्या /तिर्थक्षेत्र विकासाच्या दृष्टीने नदीवर पूल बांधणे, पूलाचे दोन्ही बाजूने पोहोच रस्ते तयार करणे, शहराच्या विकास आराखड्यानुसार नदीच्या बाजूने जाणारे रस्ते, उद्याने व जॉगिंग ट्रॅक तयार करणे तसेच पूर संरक्षक कामांतर्गत नदीच्या तीरालगत पूर संरक्षक भिंती बांधणे, घाट बांधणे या शिवाय गॅस पाईपलाईन क्रॉसिंग करणे, विद्युत वाहिनी क्रॉसिंग करणे, नदीच्या कडेने ड्रेनेज पाईपलाईन टाकणे इ. प्रकारची अपरिहार्य कामे नदीच्या निषेधक पूररेषेच्या (Blue line) आत, निषिद्ध क्षेत्रात करावी लागतात. सदर कामांच्या बांधकामासाठी संबधित यंत्रणेमार्फत ना हरकत प्रमाणपत्रांची मागणी जलसंपदा विभागाकडे करण्यात येते.

धरण सुरक्षा संहिता प्रकरण ७ मधील मुद्दा क्र.१०.९ नुसार निषेधक पूर रेषा (Blue line) व नियंत्रक पूर रेषा (Red line) यांचे नकाशे व पूर प्रभावित क्षेत्र निश्चिती असे नकाशे/ आराखडे मंजूर करण्याचे प्राधिकार खालीलप्रमाणे निश्चित केलेले आहेत.

i) मोठे प्रकल्प- मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
ii) मध्यम प्रकल्प- अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
iii) लघु प्रकल्प- कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग

सदर आराखडयाद्वारे निश्चित केलेल्या पूर प्रभावित क्षेत्र व निषिद्ध क्षेत्रात विविध विभागांकडून काही अपरिहार्य कामे करणे आवश्यक असल्यास अशा कामांसाठी जलसंपदा विभागांतर्गत क्षेत्रिय मुख्य अभियंता यांचेकडून ना हरकत प्रमाणपत्र घेणे बंधनकारक करण्यात येत आहे.

असे ना हरकत प्रमाणपत्र देताना धरण सुरक्षा संहितेमधील संबंधित तरतुदी, प्रचलित कायदे, नियम, शासन आदेश यांचा विचार करुन भविष्यात प्रस्तावित कामांना व परिसरात कोणत्याही अडचणी निर्माण होणार नाहीत याची खात्री करावी तसेच शासनाचे हीत लक्षात घेऊन आवश्यक अटी शर्तींचा समावेश करुन ना हरकत प्रमाणपत्र संबंधित अभिकरणास मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग यांनी प्रदान करावे. सदरील ना हरकत प्रमाणपत्र म्हणजे बांधकामाची परवानगी नव्हे; आवश्यक त्या परवानग्या व इतर विभागांचे ना हरकत प्रमाणपत्र घेणे ही संबंधित अभिकरणाची जबाबदारी राहील असेही जलसंपदा विभागाच्या ना हरकत प्रमाणपत्रात नमूद करावे.

मुख्य अभियंता स्तरापेक्षा खालील दर्जाच्या अधिकाऱ्यांना असे प्रमाणपत्र देण्याचे अधिकार प्रत्यायोजन (delegation) करण्यात येवू नयेत. याबाबत भविष्यात कोणतेही परिणाम झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधीत मुख्य अभियंता यांची राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१४०८०८१६५९३९६१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yashavantrao Kashinath Bhadane

Digitally signed by Yashavantrao Kashinath Bhadane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yashavantrao Kashinath Bhadane
Date: 2014.08.08 17:06:27 +05'30'

**( य.का.भदाणे )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१. सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. सर्व विभागीय आयुक्त, महसूल विभाग,
३. सर्व मुख्य अभियंता व मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, जलसंपदा विभाग,
४. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
५. संचालक, नगर विकास विभाग, पुणे,
६. सर्व अधीक्षक अभियंता/अधीक्षक अभियंता व प्रशासक, जलसंपदा विभाग,
७. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,
८. सर्व जिल्हाधिकारी, महसूल विभाग,
९. सर्व तांत्रिक कार्यासन/ तांत्रिक अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
१०. सिं.व्य.(महसूल) संग्रहार्थ.